जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण)-सर्व
जिल्हा शल्य चिकित्सक

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.७३/अर्थसंकल्प**

गो.ते.रुग्णालय आवार, ८ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक :- ०९ नोव्हेंबर, २०२१

**वाचा-** सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. अर्थस-२०१६/प्र.क्र.१५८/अर्थसंकल्प
दि. २८ सप्टेबर, २०१६.

**प्रस्तावना-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभाग अंतर्गत क्षेत्रीय कार्यालयांमार्फत राबविण्यात येणाऱ्या जिल्हा वार्षिक योजनांसदर्भात आदेश निर्गमीत करण्यात आले आहेत. मात्र सदर आदेशामध्ये सर्व जिल्ह्यांत राबवावयाच्या जिल्हा वार्षिक योजनामध्ये समानता नाही. सर्वच जिल्ह्यांमध्ये सर्व योजना राबविण्यात न आल्याने काही जिल्ह्यांना विशिष्ट योजनांतर्गत निधी उपलब्ध करुन घेऊन नागरीकांना अधिक चांगल्या आरोग्य सेवा पुरविणे शक्य झालेले नाही. सदर बाब विचारात घेऊन राज्यात राबवावयाच्या या विभागाशी संबंधित जिल्हा वार्षिक योजनांसंदर्भात स्वयंस्पष्ट निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय-**

उपरोल्लेखित पार्श्वभूमीवर या विभागामार्फत राबवावयाच्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) प्रस्ताव सहमतीसाठी नियोजन विभागाकडे सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावाच्या संदर्भात नियोजन विभागाने नोंदविलेल्या अभिप्रायांच्या अनुषंगाने सर्व जिल्हा शल्य चिकित्सक यांच्यामार्फत खालील नमूद योजना-जिल्हा वार्षीक योजना म्हणून राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)-जिल्हा रुग्णालये, विभागीय संदर्भ रुग्णालये, अस्थिव्यंग रुग्णालये (ट्रामा केअर युनिट), स्त्री रुग्णालये, ग्रामीण रुग्णालये व फिरती आश्रमशाळा पथके, इत्यादी.

| अ.क्र. | योजना | संबंधित कार्यासन |
|---|---|---|
| १ | रुग्णालयासाठी औषधे, साहित्य व साधनसामग्रीची खरेदी करणे | आरोग्य-८ |
| २ | रुग्णालयांचे बांधकाम, विस्तारीकरण, दुरुस्ती व देखभाल, अग्निसुरक्षा यंत्रणा खरेदी तसेच देखभाल दुरुस्ती, रुग्णालयांच्या इमारतींचे लेखापरिक्षण (Structural Audit) करणे तसेच विद्युत जोडणीचे लेखापरिक्षण (Electrical Audit) करणे | आरोग्य-३ |
| ३ | रुग्णालयांना प्रमाणकानुसार (मंजूर संख्येनुसार ) रुग्णवाहीकांची खरेदी करणे तसेच देखभाल दुरुस्ती | आरोग्य-४ |

२. उपरोक्त वार्षिक योजना राबविण्यासाठीची मार्गदर्शक तत्वे सोबत जोडली आहेत (परिशिष्ट -अ,ब,क). सदर जिल्हा योजनांची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने संबंधित कार्यान्वयन अधिकाऱ्यांना शासन स्तरावर मार्गदर्शन करणे/मान्यता देणे इत्यादी कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित योजनांसमोर दर्शविलेल्या या विभागातील कार्यासनांची राहील.

३. जिल्हा वार्षिक योजनांच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, पुर्णत्वाचे दाखले, खर्चाचा ताळमेळ व विनियोजन लेखे इत्यादीबाबतची माहिती आयुक्त, आरोग्य सेवा यांचे मार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी जिल्हा शल्य चिकित्सक व सहायक संचालक, आरोग्य सेवा (लेखा व लेखा परिक्षा ) पुणे यांची राहील. तसेच योजनेतील गैरव्यवहार, लेखा आक्षेप, लोकलेखा समिती इत्यादी बाबींबाबतची माहिती आयुक्त, आरोग्य सेवा यांचे मार्फत शासनास सादर करण्याची कार्यवाही/जबाबदारी जिल्हा स्तरावरील संबंधित कार्यालयीन यंत्रणेची राहिल.

४. संबंधित जिल्हा शल्य चिकीत्सक यांनी नियोजन विभागाचे पत्र क्र. डिएपी-१०१८/प्र.क्र ३४/का-१४१८, दि. २७ एप्रिल, २०१८ व समक्रमांक पत्र दि. १२ नोव्हेंबर, २०१८ मधील सुचनांनुसार संबंधित जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत प्रस्तूत योजनांसाठी लेखाशिर्ष प्राप्त करण्याचे प्रस्ताव नियोजन विभागास सादर करावेत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४६/१४८१ दिनांक १५ सप्टेंबर, २०२१ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०९१६२९४२६६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: CN = Ashok Maroti Atram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture And ADF Department
Date: 2021.11.09 17:28:06 +05'30'

**(अ.मा. आत्राम)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत-

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई (पत्राने)
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद
७) मा. मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव

८) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य)/ मा.राज्य मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव
९) सर्व मा. मंत्री / मा. राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव
१०) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
११) अपर मुख्य सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.
१२) अपर मुख्य सचिव (वित्त), महाराष्ट्र शासन.सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, महाराष्ट्र शासन.
१३) आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
१४) सर्व सह सचिव/ उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) संचालक (१/२), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई/पुणे.
१६) सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सर्व जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
१८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परीषदा.
१९) सर्व कार्यक्रम प्रमुख, आरोग्य सेवा,( आयुक्त यांचेमार्फत)
२०) सर्व जिल्हा शल्य चिकीत्सक, आरोग्य सेवा ,( आयुक्त यांचेमार्फत).
२१) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, आरोग्य सेवा ,( आयुक्त यांचेमार्फत).
२२) सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा ,( आयुक्त यांचेमार्फत).
२३) निवडनस्ती (अर्थसंकल्प).

**शासन निर्णय क्र. अर्थस २०२०/प्र.क्र. ७३/ अर्थसंकल्प. दि. ०९ नोव्हेंबर, २०२१**

**परिशिष्ट अ**

**“जिल्हा शल्य चिकीत्सकांमार्फत राबवावयाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या योजनांसाठी मार्गदर्शक सूचना**

**१) रुग्णालयासाठी औषधे, साहित्य व साधनसामग्रीची खरेदी करणे.**

राज्यातील सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारित असलेल्या जिल्हा/विभागीय/स्त्री/ सामान्य/ उपजिल्हा/ग्रामीण व इतर रुग्णालयांसाठी लागणारी औषधी व साहित्य सामुग्री शासन पत्र क्र. एसडीएल-२०१९/प्र.क्र.१८१/ आरोग्य-८, दिनांक २१.११.२०१९ व शासन पत्र क्र. एसडीएल-२०२०/प्र.क्र.१८१/आरोग्य-८, दिनांक १५ मार्च २०२१ अन्वये शासनाने निश्चित केलेल्या SDL व SCL च्या यादीतील व त्यामधील विनिर्देशानुसार ( Specification ) नुसार असावीत. तसेच GOI च्या मार्गदर्शक कार्यवाही करावी.

रुग्णालयासाठी आवश्यक यंत्रसामुग्रीबाबत IPHS अंतर्गत मान्य असलेली यंत्रसामुग्री व उपकरणे असणे आवश्यक आहे. याकरिता शासकिय रुग्णालयाकरिता खरेदी करावयाच्या यंत्रसामुग्री, उपकरणे, साधनसामुग्री व औषधे या बाबींचे तांत्रिक विनिर्देश निश्चित करण्यासाठी शासन निर्णय, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र. एचबीपी-२०१७/प्र.क्र.१६६/१७/औषधे-१, दिनांक ३१.१०.२०१७ अन्वये तांत्रिक समितीची स्थापना करण्यात आलेली आहे. त्यानुसार यंत्रसामुग्री, उपकरणे व तद्अनुषंगिक प्रस्तावीत बाबींचे विनिर्देश ( Specification ) असणे आवश्यक आहे.

वरील बाबींच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१. जिल्हा शल्यचिकित्सक, यांच्या अधिनस्त असलेल्या संस्थाकरिता आवश्यक औषधी/ साहित्य सामुग्री/यंत्रसामुग्री/उपकरणे इत्यादी बाबींचा प्रस्ताव तयार करतील.
२. औषधी व साहित्य सामुग्री , यंत्रसामुग्री व उपकरणे याकरिता प्रस्तावीत केलेली खरेदी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचा अवलंब करणे आवश्यक आहे.
३. खरेदी प्रक्रियेचा स्तर शासनाने वेळोवेळी निर्धारित केलेला व वित्तीय मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावा.
४. जिल्हा नियोजन समितीकडून प्राप्त निधीच्या मर्यादेत प्रस्ताव असणे आवश्यक आहे.
५. औषधी व साहित्य सामुग्री शासनाने निश्चित केलेल्या SDL व SCL च्या यादीतील व त्यामधील विनिर्देशानुसार ( Specification ) नुसार असावीत. तसेच GOI च्या मार्गदर्शक सुचनेनुसार असणे आवश्यक आहे.
६. SDL व SCL च्या व्यतिरिक्त केंद्र शासनाने तातडीच्या स्वरुपात मान्यता दिलेली (साथरोग/ उद्रेक/Epidemic/Pendemic कालावधीत ) औषधी व साहित्य सामुग्री उपसंचालक स्तरावर तांत्रिक मान्यता घेऊन खरेदी करता येईल.

७. रुग्णालयासाठी आवश्यक यंत्रसामुग्री/ उपकरणे बाबत IPHS अंतर्गत मान्य केलेल्या निकषानुसार (Norms) यंत्रसामुग्री व उपकरणे असणे आवश्यक आहे.

८. औषधी व साहित्य सामुग्री, यंत्रसामुग्री व उपकरणे यांचा पुरवठा राज्यस्तरावरुन होणार आहे किंवा नाही, याची खातरजमा करुनच खरेदी करण्यात यावी. तसेच याअंतर्गत रुग्णालयांसाठी नव्याने खरेदी करावयाच्या औषधे, साहीत्य व साधनसामुग्री तसेच यंत्रसामुग्रीसाठी संपूर्ण निधी खर्च करण्याऐवजी आवश्यकतेनुसार ८० टक्के निधी खर्च करता येइल. तसेच या योजनेखाली पुर्वी खरेदीकरण्यात आलेली/येणारी साधनसामुग्री व यंत्रसामुग्री सुस्थितीत ठेवण्याकरीता त्याची देखभाल व दुरुस्ती होणे आवश्यक असल्याने प्रस्तुत योजनेखालील मंजूर निधीच्या कमाल २० टक्के पर्यंत निधी देखभाल व दुरुस्ती याकरीता वापरणे अनुज्ञेय राहील.

९. निविदा मागविणे, स्विकृती करणे व खरेदीबाबतचे अधिकार शासनाच्या त्या-त्या वेळच्या प्रचलित कार्यपध्दती व धोरणानुसार राहतील.

१०. सार्वजनिक आरोग्य विभाग, नियोजन विभाग, उद्योग उर्जा व कामगार विभाग व वित्त विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित झालेल्या शासन निर्णय व परिपत्रकातील मार्गदर्शक सूचना विचारात घेवून प्रस्ताव सादर करण्यात यावेत.

११. जिल्हा नियोजन समितीच्या योजनांवरील खर्चास तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार, उपसंचालक आरोग्य सेवा, ( परिमंडळे) यांना असतील.

१२. जिल्हा नियोजन समितीच्या योजनांवरील प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देण्याचे अधिकार संबधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहेत त्यानुसार कार्यवाही करावी.

१३. जिल्हा योजनेच्या अंमलबजावणीवर, खर्चावर व तांत्रिक बाबींवर उपसंचालक, आरोग्य सेवा, (परिमंडळे ) यांचे नियंत्रण असेल व जिल्हा स्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक हे जबाबदार राहतील.

१४. जिल्हा शल्यचिकित्सक कार्यालयातील मुख्य प्रशासकिय अधिकारी/प्रशासकिय अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि जिल्हा शल्यचिकितसक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

१५. जिल्हास्तरीय योजनांचे मासिक खर्चाचे अहवाल दरमहा ५ तारखेपर्यंत जिल्हा शल्यचिकित्सक व तत्सम यंत्रणा, जिल्हा नियोजन अधिकारी तथा जिल्हाधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळे ), सहायक संचालक, आरोग्य सेवा, ( लेखा व लेखा परिक्षा ) पुणे व आयुक्तालय यांना सादर करतील.

१६. नियोजन विभागाच्या दिनांक १६/०२/२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.५ नुसार जिल्हा योजनेतील गैरव्यवहार, लेखा आक्षेप, लोकलेखा समिती इत्यादी बाबींबाबत माहिती सादर करण्याची/कार्यवाही करण्याची जवाबदारी जिल्हा पातळीवरील संबंधित अधिकारी व सार्वजनिक आरोग्य विभागाची राहिल.

**<u>शासन निर्णय क्र. अर्थस २०२०/प्र.क्र. ७३/ अर्थसंकल्प. दि. ०९ नोव्हेंबर, २०२१</u>**

**<u>परिशिष्ट ब</u>**

**"जिल्हा शल्य चिकीत्सकांमार्फत राबवावयाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या योजनांसाठी मार्गदर्शक सूचना**

**२) रुग्णालयांचे बांधकाम, विस्तारीकरण, दुरुस्ती व देखभाल, अग्निसुरक्षा यंत्रणा खरेदी तसेच देखभाल दुरुस्ती , रुग्णालयांच्या इमारतींचे लेखापरिक्षण (Structural Audit) करणे तसेच विद्युत जोडणीचे लेखापरिक्षण (Electrical Audit) करणे.**

जिल्हयातील सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील ग्रमिण रुग्णालये (३० खाटा), उपजिल्हा रुग्णालये (५०/१०० खाटा) सामान्य / स्त्री / विभागीय / जिल्हा रुग्णालयातील मुख्य इमारत व अधिकारी/कर्मचारी निवासस्थाने यांची देखभाल व दुरुस्ती या बाबींसाठी या योजने अंतर्गत अनुदान उपलब्ध करण्यात येईल. राज्यस्तरावरुन सुरु कामांसाठी यातून निधी उपलब्ध होणार नाही. मात्र बांधकाम पूर्ण असलेल्या परंतू किरकोळ बाबींसाठी हस्तांतरण शिल्लक राहिलेल्या बाबी उदा. थ्री फेज जोडणी, नळ जोडणी, उदवाहन इत्यादीसाठी निधी उपलब्ध होईल.

जिल्हा वार्षिक योजनेतून घेण्यात येणारी कामे देखभाल दुरुस्ती जास्तीत जास्त २ वर्षे तसेच नविन कामे ३ वर्षाच्या कालावधीमध्ये पूर्ण करणे आवश्यक राहतील.

१. योजनेचा आराखडा तयार करतांना मानव विकास निर्देशांक उंचावणे, जिल्हयाच्या मूलभूत गरजा, सामाजिक गरजा, सामाजिक व भौगोलिक व्याप्ती यांचा विचार करण्यात यावा. तसेच राज्यस्तरावरील योजनांची व्दिरुक्ती टाळावी.
२. योजना आराखडा तयार करतांना ज्या ठिकाणी मूलभूत सोयी- सुविधा नाहीत अशा योजनाना प्राधान्य देण्यात यावे.
३. स्थानिक निधीतून सुरु असलेल्या बाबी/योजना प्राधान्याने प्रस्तावीत कराव्यात. सदर योजना प्राधान्याने पूर्ण होतील यांचे नियोजन करावे.
४. रुग्णालयामध्ये " अग्नीशमन यंत्रणा (Fire Fighting Equipment's Installations) उभारणे व देखभाल दुरुस्ती " यासाठी अनुदान उपलब्धते बाबत दक्षता घ्यावी.
५. अग्निशमन यंत्रणा बाबत तांत्रिक मान्यता ही अग्नीशामक विभागाची राहील तर सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कामे करण्यात येतील.
६. रुग्णालयांच्या i) "इमारतींचे रचना लेखापरीक्षण ( Structural Audit of Building ) करणे" तसेच ii) "विद्युत जोडणीचे लेखा परीक्षण ( Electrical Installation Audit ) करणे" या बाबींचे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या " स्थापत्य " व " विद्युत " विभागाच्या मार्गदर्शक सूचना व विहीत केलेल्या कार्यपध्दीतीने करावे.
७. जिल्हा स्तरावर दरवर्षी नियोजन करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ( स्थापत्य/विद्युत) निकषानुसार सर्व आरोग्य संस्थाना करावयाच्या रचना , लेखा परिक्षण आणि विद्युत जोडणी

लेखापरिक्षण याबाबत अहवाल/अंदाजपत्रके मागविण्यात यावी व त्यानुसार प्रस्ताव जिल्हा नियोजन समिती यांना सादर करावेत. दरवर्षी निकषानुसार रुग्णालयीन इमारतीचे लेखापरिक्षण अहवाल उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही बांधकाम विभागाने प्राधान्याने करावी.

८. आपत्कालीन ( कोविड ) साथरोग परिस्थितीशी सामना करण्यासाठी रुग्णालयात मोठया प्रमाणात ऑक्सीजन जनरेटर प्लॅन्ट ( LMO Cryogenic tank & oxygen generation plants ) बसविण्यात आलेले आहेत, त्यांच्या देखभाल व दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध होईल याबाबत दक्षता घ्यावी.

९. जिल्हा शल्य चिकित्सक यांनी सार्वजनिक बांधकाम विभाग ( स्थापत्य/विद्युत ) मार्फत देखभाल दुरुस्तीसाठी अंदाज आराखडे तयार करावेत आणि तांत्रिक मान्यता प्राप्त करुन प्रस्ताव जिल्हा नियोजन समितीला सादर करावा.

१०. अथवा सदर ऑक्सीजन जनरेटर प्लॅंन्ट आणि Cryogenic tank च्या देखभाल दुरुस्ती साठी तांत्रिक बाहय यंत्रणा नेमण्यासाठी निधी उपलब्ध होईल.

११. प्रत्येक योजनेचे/ बाबींचे अंदाज आराखडे हे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत तयार करुन घ्यावेत.

१२. सर्व प्रस्तावांना सार्वजनिक बांधकाम विभागांची तांत्रिक मान्यता घ्यावी.

१३. जिल्हा नियोजन समितीच्या योजनांवरील प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देण्याचे अधिकार संबधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहेत.

१४. जिल्हा योजनेच्या अंमजबजावणीवर, खर्चावर व तांत्रिक बाबींवर उपसंचालक, आरोग्य सेवा, ( परिमंडळे ) यांचे नियंत्रण असेल व जिल्हा स्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक हे जबाबदार राहतील.

१५. जिल्हा शल्यचिकित्सक कार्यालयातील मुख्य प्रशासकिय अधिकारी/प्रशासकिय अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि जिल्हा शल्यचिकित्सक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

१६. आराखडयात प्रस्तावीत प्रत्येक योजनेच्या खर्चाची बाबवार माहिती जिल्हा नियोजन समितीला देणे बंधनकारक राहील.

१७. जिल्हास्तरीय योजनांचे मासिक खर्चाचे अहवाल दरमहा ५ तारखेपर्यंत भौतिक मानकानुसार व आर्थिक मर्यादेत जिल्हा शल्यचिकित्सक व तत्सम यंत्रणा, जिल्हा नियोजन अधिकारी तथा जिल्हाधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळे), सहायक संचालक, आरोग्य सेवा, ( लेखा व लेखा परिक्षा ) पुणे व आयुक्तालय यांना सादर करतील.

१८. रुग्णालयांचे बांधकाम व विस्तारीकरणाच्या नवीन बांधकामांसाठी किमान ८० टक्के निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक असेल. तसेच या योजनेखाली मंजूर निधीच्या कमाल २० टक्के पर्यंत निधी बांधकामाच्या देखभाल व दुरुस्ती या करीता वापरणे अनुज्ञेय रहील.

१९. नियोजन विभागाच्या दिनांक १६/०२/२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.५ नुसार जिल्हा योजनेतील गैरव्यवहार, लेखा आक्षेप, लोकलेखा समिती इत्यादी बाबींबाबत माहिती सादर करण्याची/कार्यवाही करण्याची जवाबदारी जिल्हा पातळीवरील संबंधित अधिकारी व सार्वजनिक आरोग्य विभागाची राहिल.

**शासन निर्णय क्र. अर्थस २०२०/प्र.क्र. ७३/ अर्थसंकल्प. दि. ०९ नोव्हेंबर, २०२१**

**परिशिष्ट क**

**"जिल्हा शल्य चिकीत्सकांमार्फत राबवावयाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या योजनांसाठी मार्गदर्शक सूचना**

**३) रुग्णालयांना प्रमाणकानुसार (मंजूर संख्येनुसार ) रुग्णवाहीकांची खरेदी करणे तसेच देखभाल दुरुस्ती.**

शासकिय रुग्णालयातील जुन्या व निर्लेखन पात्र असलेल्या रुग्णवाहिका ऐवजी नविन रुग्णवाहिका खरेदी करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सुचना.

१. शासकिय रुग्णालयाकरिता आवश्यक असलेल्या रुग्णवाहिकांचे खालीलप्रमाणे निकष ठरविण्यात आलेले आहेत.
   अ) ट्रामा केअर युनिट - १ नग
   आ) ग्रामीण रुग्णालय - १ नग
   इ) उपजिल्हा रुग्णालय ( ५० खाटा ) - २ नग.
   ई) उपजिल्हा रुग्णालय ( १०० खाटा) - ३ नग.
   उ) स्त्री रुग्णालय (१०० किंवा अधिक खाटा) - ४ नग. व १०० पेक्षा कमी खाटा - २ नग.
   ऊ) विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय - ४ नग.
   ऋ) जिल्हा/सामान्य रुग्णालय -
   ऌ) १०० ते २०० खाटा - ४ नग.
   ऍ) २०१ ते ४०० खाटा - ६ नग.
   ऎ) ४०१ पेक्षा अधिक खाटा- ८ नग.
   ए) मानसिक आजार रुग्णालये - ४ नग.
२. जिल्हा शल्यचिकित्सक, यांच्या अधिनस्त असलेल्या संस्थाकरिता निर्लेखीत रुग्णवाहिका ऐंवजी आवश्यकता व वरील निकषानुसार रुग्णवाहिका बाबतचा प्रस्ताव तयार करतील.
३. सार्वजनिक आरोग्य विभागाने मान्यता दिलेल्या १) जुन्या व निर्लेखित रुग्णवाहिकां ऐवजी नविन रुग्णवाहिका खरेदी करणे. २) नविन अतिरिक्त रुग्णवाहिका मंजूर केली असल्यास अशा प्रकरणी नविन रुग्णवाहिकेची खरेदीकरिता निधी उपलब्ध होईल.
४. जिल्हा नियोजन समितीकडून प्राप्त निधीच्या मर्यादेत प्रस्ताव असणे आवश्यक आहे.
५. रुग्णवाहिकांची खरेदी करतांना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचा अवलंब करणे आवश्यक आहे.
६. रुग्णवाहिकांच्या खरेदीसाठी एकूण मंजूर तरतूदीतील ८० टक्के निधी खर्च करता येइल. तसेच या योजनेखाली पुर्वी खरेदीकरण्यात आलेल्या/येणाऱ्या रुग्णवाहिकांना सुस्थितीत ठेवण्याकरीता त्याची देखभाल व दुरुस्ती होणे आवश्यक असल्याने प्रस्तुत योजनेखालील मंजूर निधीच्या कमाल २० टक्के पर्यंत निधी देखभाल व दुरुस्ती याकरीता वापरणे अनुज्ञेय राहील.

७. रुग्णवाहिकांकरिता आवश्यक विनिर्देश (Specification) हे उपसंचालक आरोग्य सेवा (परिवहन) यांचेकडून प्राप्त करुन घ्यावेत.
८. रुग्णवाहिका ही वेळोवेळी परिवहन विभागाच्या निकषानुसार तसेच रुग्णवाहिकेच्या AIS Code नुसार खरेदी करावी.
९. रुग्णवाहिकेचा पुरवठा राज्यस्तरावरुन होणार आहे किंवा नाही, याची खातरजमा करुनच खरेदी करण्यात यावी.
१०. निविदा मागविणे, स्विकृती करणे व खरेदीबाबतचे अधिकार शासनाच्या त्या-त्या वेळच्या प्रचलित कार्यपध्दती व धोरणानुसार राहतील.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग, नियोजन विभाग, उद्योग उर्जा व कामगार विभाग व वित्त विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित झालेल्या शासन निर्णय व परिपत्रकातील मार्गदर्शक सूचना विचारात घेवून प्रस्ताव सादर करावेत.
१२. जिल्हा नियोजन समितीच्या योजनांवरील खर्चास तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार, उपसंचालक आरोग्य सेवा, ( परिवहन ) पुणे यांच्या मान्यतेने उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळे) यांनी द्यावेत.
१३. रुग्णवाहिका खरेदी करतांना रुग्णवाहिकेची संख्या निकषानुसारच निश्चित करावी.
१४. रुग्णवाहिका वगळता इतर वाहने खरेदी करु नयेत.
१५. जिल्हा नियोजन समितीच्या योजनांवरील प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देण्याचे अधिकार संबधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहेत.
१६. जिल्हा योजनेच्या अंमजबजावणीवर, खर्चावर व तांत्रिक बाबींवर उपसंचालक, आरोग्य सेवा, ( परिमंडळे ) यांचे नियंत्रण असेल व जिल्हा स्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक हे जबाबदार राहतील.
१७. जिल्हा शल्यचिकित्सक कार्यालयातील मुख्य प्रशासकिय अधिकारी/प्रशासकिय अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि जिल्हा शल्यचिकित्सक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.
१८. जिल्हास्तरीय योजनांचे मासिक खर्चाचे अहवाल दरमहा ५ तारखेपर्यंत जिल्हा शल्यचिकित्सक व तत्सम यंत्रणा, जिल्हा नियोजन अधिकारी तथा जिल्हाधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळे), सहायक संचालक, आरोग्य सेवा, ( लेखा व लेखा परिक्षा ) पुणे व आयुक्तालय यांना सादर करतील.
१९. नियोजन विभागाच्या दिनांक १६/०२/२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.५ नुसार जिल्हा योजनेतील गैरव्यवहार, लेखा आक्षेप, लोकलेखा समिती इत्यादी बाबींबाबत माहिती सादर करण्याची/कार्यवाही करण्याची जवाबदारी जिल्हा पातळीवरील संबंधित अधिकारी व सार्वजनिक आरोग्य विभागाची राहिल.